सातारा जिल्ह्यातील माण तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.२३/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- १५ फेब्रुवारी, २०१९**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र .मुअ(पुणे)/का-२/रेशा/९१/४९०९/२०१८, दि.१९.०७.२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सातारा यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सातारा जिल्ह्यातील माण तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सातारा यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, सातारा यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सातारा यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सातारा यांचा ठराव विचारात घेऊन सातारा जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा ३८ ते जांब जाखणगांव खातगूण कटगूण ते रा.मा. १४१ | इतर जिल्हा मार्ग ९१ | (सा.क्र. ०/०० ते ११/५००) | ११.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९३ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | प्र.जि.मा. १० दरुज, पेडगांव, मांडवे, तडवळे, डोंबेवाडी, यरमलवाडी, एनकूळ ते प्र.जि.मा.-४३ रस्ता | इतर जिल्हा मार्ग ९२ | (सा.क्र. ३/०० ते २४/२००) | २१.२०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९४ |
| ३. | वडूज (रा.मा.-१२४) ते कुमठे (रा.मा.१४७) रस्ता | इजिमा ९३ | (सा.क्र. ०/०० ते १०/५००) | १०.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९५ |
| ४. | रा.मा. ६० ते बनपुरी अंबवडे होळीचागांव शेनवडी चोराडे (रा.मा. १४३) रस्ता | इजिमा ९९ व. | सा.क्र. ०/०० ते १५/२०० कि.मी. | १६.२०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९६ |
| | | इजिमा १०१ | सा.क्र. ९/४०० ते १०/४०० कि.मी. | | |
| ५. | प्रजिमा १० ते धारपुडी खटाव जाखणगांव ते रा. मा.१४७ | इ.जि.मा. १०० | सा.क्र. ०/०० ते १२.०० | १२.०० कि.मी | प्रमुख जिल्हा मार्ग-९७ |
| ६. | गोपूज वाकळवाडी वांझोळी वडगांव गोरेगांव ते रा.मा.१५८ | इ.जि.मा. १०२ | (सा.क्र. ०/०० ते १६.५००) | १६.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९८ |
| ७. | रा.मा. १२४ ते लाडेगांव वांझोळी भूषणगर शेनवडी म्हासुर्णे रा.मा. १४३ | इ.जि.मा. १०३ | (सा.क्र. ०/०० ते १४.०००) | १४.००० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९९ |
| ८. | बुध, निढळ, पेडगांव, वडुज रा.मा.१२४ | इजिमा १०५ | (सा.क्र. ०/०० ते २०/००) | २०.०० कि.मी | प्रमुख जिल्हा मार्ग-१०० |
| | **एकूण** | | | **१२१.९० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील सातारा जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१२१.९०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२४८५.६१ + १२१.९००) म्हणजेच **२६०७.५१ कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **१२१.९०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (३१३६.०८० - १२१.९००) म्हणजेच **२९८८.२८० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१५१२४२५८७०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2019.02.15 12:45:00 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,सातारा.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सातारा (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.